**राज्यात औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकासासंदर्भात प्राप्त प्रस्तावांना प्रशासकिय मान्यता.**
**राईस मिल क्लस्टर, रामटेक, जिल्हा -नागपूर.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग,**
**शासन ज्ञापन क्रमांक: मऔधो-२०१५/ प्र. क्र. ८९/ उद्योग-२**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २७ ऑगस्ट, २०१५.

**विषय :** राज्यात औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकासासंदर्भात प्राप्त प्रस्तावांना प्रशासकिय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ**
१) शासन निर्णय क्र. आयआयआय- पॉलीसी २०१०/प्र. क्र. ७६८/उद्योग-२, दिनांक . २२ फेब्रुवारी, २०१३.
२) शासन निर्णय क्रमांक: औपासू-२०१२/प्र.क्र.२३४/उद्योग-२,दिनांक २५ फेब्रुवारी,२०१४.
३) कार्यालयीन आदेश क्रमांक: सुसंबै-२०१४/ प्र.क्र.५३/उद्योग-२, दिनांक २९ मार्च,२०१४.
४) दि. २०/०३/२०१४ रोजी झालेल्या सुकाणू समितीच्या पहिल्या बैठकीचे इतिवृत्त, दिनांक २९ मार्च, २०१४.
५) दि. १९/१२/२०१४ रोजी झालेल्या सुकाणू समितीच्या दुसऱ्या बैठकीचे इतिवृत्त, दिनांक ६ जानेवारी, २०१५.
६) शासन ज्ञापन क्र. सुसंबै -२०१४/ प्र. क्र. ५३/उद्योग-२, दिनांक २८ जानेवारी, २०१५
७) विकास आयुक्त (उद्योग) यांचेकडून प्राप्त प्रस्ताव
८) महावितरण, नागपूर आदेश क्र. अअ/नाग्रप्रवि/तांत्रिक-१८९५, दिनांक १४ मे, २०१५

**ज्ञापन:**

राज्यात औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मीती व विकास या योजनेअंतर्गत सार्वजनिक बांधकाम विभाग या कार्यान्वियन यंत्राणेने प्रस्ताव सादर केले आहेत.

२. मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील महाराष्ट्र औद्योगिक पायाभूत सुविधा विकास समिती ने दि. १९/१२/२०१४ रोजी झालेल्या बैठकीत राईस मिल क्लस्टर, रामटेक, जिल्हा-नागपूर येथे अखंडीत विद्युत पुरवठा करण्याकरिता प्रस्तावाला मान्यता दिलेली आहे.

सदर प्रकल्पासाठी महावितरण ही कार्यान्वयन यंत्रणा असून, अधिक्षक अभियंता, (नागपूर ग्रामीण), महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, नागपूर यांनी सन २०१३-२०१४ च्या दरसूचीवर आधारीत एकूण रु. ९,६५,१०,०२८.९६/- (अक्षरी रु. नऊ कोटी पासष्ट लाख दहा हजार अठ्ठावीस व शहाण्णव पैसे फक्त) इतक्या रकमेचे अंदाजपत्रक सादर केलेले आहे.

३. सदर प्रकल्पाचे नकाशे व अंदाजपत्रकाची अधिक्षक अभियंता, (नागपूर ग्रामीण), महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, नागपूर यांनी तपासणी केली असून रु. ९,६५,१०,०२८.९६/- (अक्षरी . नऊ कोटी पासष्ट लाख दहा हजार अठ्ठावीस व शहाण्णव पैसे फक्त) इतक्या रकमेस त्यांच्या क्र अअ/नाग्रप्रवि/तांत्रिक-१८९५, दिनांक १४ मे, २०१५ च्या आदेशान्वये तांत्रिक मान्यता दिली आहे. त्यानुसार रु. ९,६५,१०,०२८.९६/- (अक्षरी रु. नऊ कोटी पासष्ट लाख दहा हजार अठ्ठावीस व शहाण्णव पैसे फक्त) इतक्या खर्चाचे नकाशे व अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

४. ही शासन मान्यता संदर्भिय क्र. ५ व ६ येथे नमूद केलेल्या सुकाणू समितीच्या दिनांक २०/०३/२०१४ व दिनांक १९/१२/२०१४ रोजी झालेल्या बैठकीमध्ये प्राप्त मंजूरी व सदरहू बैठकीतील सूचनांनुसार अवलंबावयाच्या कार्यपध्दतीनुसार तसेच उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. औपासू-२०१२/प्र.क्र.२३४/उद्योग-२, दिनांक २५/०२/२०१४ मधील परि. ६ नुसार देण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन देण्यात येत आहे.

५. सदर कामासाठी येणारा खर्च लेखाशीर्ष क्र. के-१०, मुख्य लेखाशीर्ष-४८७५ इतर उद्योगावरील भांडवली खर्च उपलेखाशीर्ष-६० इतर उद्योग, ८०० इतर खर्च, ८००(००) (०१) औद्योगिक पायाभूत सुविधांचा विकास व निर्मिती (योजनांतर्गत) (४८७५-००२५) या योजनेखाली उपलब्ध असलेल्या निधीमधून भागविण्यात यावा.

६. सदर प्रकल्पाची सुरुवात सन २०१५-१६ या आर्थिक वर्षापासून होत आहे.

७. प्रस्तावित प्रकल्प हा un- interrupted Power Supply साठी असल्याने, एकूण रु. ९,६५,१०,०२८.९६/- इतकी रक्कम एका टप्प्यात वितरीत करण्यात यावी. तथापि, देखभाल दुरुस्ती संदर्भात संबंधित उद्योग समूहाच्या संघटनेने MSEDCL शी करारनामा करावा.

८. हे ज्ञापन नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २२१ / १४६ दिनांक १०/७/२०१४ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २३२ / १४ / व्यय-१६ दिनांक २६/०८/२०१४ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०१५०८२०११३९३९०४१० असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Venkatesh Hanamantrao Kulkarni

Digitally signed by Venkatesh Hanamantrao Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6c45807d6643737585e13204d4be0f3ed1b0f2e62806f55857f2a7ad678caa4d, cn=Venkatesh Hanamantrao Kulkarni
Date: 2015.09.04 16:56:23 +05'30'

**(व्यं. ह. कुलकर्णी)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति:**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षण), मुंबई.
२) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षण), नागपूर.

३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखा परीक्षण अधिकारी, मुंबई.
५) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई- ४०० ०३२.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
७) अधीक्षक अभियंता, नागपूर (ग्रामीण), महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित , विद्युत भवन, तळ मजला, काटोल रोड, नागपूर, ४४० ०१३.
८) वित्त विभाग, (कार्यासन अर्थसंकल्प-१४/ व्यय-१६ ), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९) नियोजन विभाग, (कार्यासन-१४६१), मंत्रालय, मुंबई.
१०) कक्ष अधिकारी, (प्रशासन-१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मुंबई-४०० ०३२.
११) निवड नस्ती (उद्योग-२)